**उपजिल्हा निवडणूक अधिकारी व त्यांच्या अंतर्गत असलेल्या निवडणूक कर्मचाऱ्यांकडे इतर कामे न सोपविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**परिपत्रक क्रमांक : संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३०७/२३/३३,**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २६ मे, २०२३

परिपत्रक

भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारितील निवडणूकांसाठी (लोकसभा, राज्यसभा, विधानसभा, विधानपरिषद, राष्ट्रपती, उपराष्ट्रपती निवडणूक) मुख्य निवडणूक अधिकारी कार्यालयाकडून निर्माण करण्यात आलेल्या उप जिल्हा निवडणूक अधिकारी तसेच त्यांच्या कार्यालयातील अन्य निवडणूक अधिकारी/कर्मचाऱ्यांकडे जिल्ह्यातील इतर निवडणूका तसेच इतर प्रशासकीय/सक्रिय कामे सोपविण्यात येत असल्याचे निर्देशनास आले आहे.

या संदर्भात नमूद करण्यात येते की, भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारितील निवडणूका संदर्भातील सर्व कामे व तदनुषंगिक कामे उदा. निवडणूकीचे संचलन करणे, ईव्हीएम मशीन्सची प्रथम स्तरीय तपासणी करणे, एका कॅलेंडर वर्षामध्ये चार अर्हता दिनांकानुसार मतदार याद्या तयार करणे, मतदार ओळखपत्रे तयार करुन त्यांचे वितरण करणे, मतदारसंघाचे परिसीमन, स्वीप अंतर्गत मतदार नोंदणी वाढविण्यासाठी कार्यक्रम आयोजित करणे इत्यादी कामांकरिता जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांच्या मदतीसाठी उपजिल्हा निवडणूक अधिकारी हे उप जिल्हाधिकारी संवर्गातील पद तसेच नायब तहसिलदार, अव्वल कारकून, लिपीक व शिपायांची काही पदे या कार्यालयाकडून राज्यातील सर्व जिल्ह्यांकरिता २०१५ निवडणूका या लेखाशीर्षाखाली निर्माण करण्यात आली आहेत. **तसेच या पदावरील अधिकाऱ्याचे वेतन व इतर भत्ते हे फक्त भारत निवडणूक आयोगाच्या निवडणूकांकरिता असलेल्या "२०१५-निवडणूका" या लेखाशीर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात येते तसेच, सदर खर्चाची ५० टक्के प्रतिपूर्ती केंद्र शासनाकडून करण्यात येते. तसेच, लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५० च्या कलम १३-सीसी नुसार उपरोक्त प्रयोजनार्थ नियुक्त अधिकारी/कर्मचारी या कालावधीत भारत निवडणूक आयोगाच्या नियंत्रण, पर्यवेक्षण आणि शिस्तीखाली (Control, Superintendence & Discipline) असतात.**

वरील पदांपैकी उपजिल्हा निवडणूक अधिकारी हे अस्थायी स्वरुपाचे पद असून सदर पदाला या कार्यालयाकडून नियमितरित्या मुदतवाढ घेण्यात येते. भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारितील निवडणूकांबाबतची सर्व कामे जिल्हा स्तरावर करण्याकरिता उप जिल्हा निवडणूक अधिकारी हे अत्यंत महत्त्वाचे पद असून सदर पदावरील अधिकाऱ्यांकडे/इतर कर्मचाऱ्यांकडे आयोगाच्या अखत्यारितील निवडणूक विषयक कामांव्यतिरिक्त अन्ये कामे सोपविल्यास त्याचे विपरित परिणाम निवडणूक विषयक कामांवर होण्याची शक्यता आहे. या संदर्भात या कार्यालयाने

सर्व विभागीय आयुक्त तसेच सर्व जिल्हाधिकाऱ्यांना वेळोवेळी आदेश दिले असूनही सदर आदेशांचे पालन होत नसल्याचे निदर्शनास येते.

आगामी लोकसभा व विधानसभेच्या सार्वत्रिक निवडणुकांच्या सर्व कामकाजाची जबाबदारी जिल्ह्यांमध्ये प्रामुख्याने तेथील उपजिल्हा निवडणूक अधिकारी व त्यांच्या अतंर्गत असलेल्या कर्मचारी वर्गावरच असते. भारत निवडणूक आयोगाने सार्वत्रिक निवडणूक-२०२४ च्या पुर्वतयारीच्या अनुषंगाने विहीत केलेल्या योजनेनुसार निवडणूक संबंधित सर्व कामे विहीत कालावधीमध्ये पूर्ण करणे आवश्यक आहे.

सबब, आपणांस विनंती आहे की, भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारितील निवडणूक विषयक कामाची व्याप्ती तसेच आगामी वर्षभरात होणाऱ्या निवडणूका विचारात घेता या कार्यालयाकडून राज्यातील सर्व जिल्ह्यांच्या आस्थापनांवर निर्माण करण्यात आलेल्या उपजिल्हा निवडणूक अधिकारी पदावरील अधिकाऱ्यांकडे/इतर कर्मचाऱ्यांकडे दुसऱ्या कोणत्याही पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येऊ नये. त्याचप्रमाणे उप जिल्हा निवडणूक अधिकाऱ्यांकडे सोपविण्यात आलेली भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारितील निवडणूक विषयक कामेच फक्त त्यांच्याकडून योग्यरित्या केली जात आहेत याची आपण वेळोवेळी खात्री करुन घ्यावी व कोणत्याही परिस्थितीत त्यांच्याकडे या निवडणुकांव्यतिरिक्त अन्य कोणत्याही निवडणूकांची व प्रशासकीय कामे सोपविली जाणार नाहीत याबाबत दक्षता घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०५२६१२५७२३५००७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**(श्रीकांत देशपांडे)**
**अपर मुख्य सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रति,**

**सर्व विभागीय आयुक्त,**

**प्रत माहिती व कार्यवाहीसाठी अग्रेषित:-**

१) अपर मुख्य सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२) जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी, सर्व.
३) उप जिल्हाधिकारी व उप जिल्हा निवडणूक अधिकारी, सर्व.
४) निवडनस्ती.